**स्वतंत्र मराठी भाषा विभागासाठी मा. मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली शक्ती प्रदत्त समिती नियुक्त करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय, क्रमांक :-शप्रस-२११०/प्र.क्र.११६/२०-ब,

मंत्रालय, मुंबई - ४०० ००३२.

दिनांक- **१४ जुलै, २०१०**

**प्रस्तावना:-**

मराठी भाषेचा सर्वांगिण विकासाच्या दृष्टीकोनातून महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षामध्ये **मराठी भाषा विभाग** असा स्वतंत्र प्रशासकीय विभाग स्थापन करण्याचा निर्णय मंत्रिमंडळाच्या दिनांक २४ जून २०१० च्या बैठकीत घेतला आहे. मराठी भाषा विभाग लवकर कार्यान्वित होण्याच्या दृष्टीने मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली मराठी भाषा विभाग कार्यान्वित होईपर्यंत शक्ती प्रदत्त समिती नियुक्त करण्यास मान्यता देण्याचा निर्णय मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेण्यात आला. त्यानुसार मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदत्त समिती नियुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नविन **मराठी भाषा विभाग** लवकर कार्यान्वित होण्याच्या दृष्टीने मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली शक्ती प्रदत्त समिती नियुक्त करण्यास व सदर समितीमध्ये खालीलप्रमाणे अध्यक्ष व सदस्य यांचा अंतर्भाव करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १) मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव (वित्त) | सदस्य |
| ३) प्रधान सचिव (नियोजन) | सदस्य |
| ४) प्रधान सचिव, पर्यटनव सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य |
| ६) प्रधान सचिव, (राजशिष्टाचार) | सदस्य |
| ७) प्रधान सचिव व विशेष चौकशी अधिकारी-१ सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| ८) सचिव (र.व का.), सामान्य प्रशासन विभाग, | सदस्य |

सदर समितीला खालीलप्रमाणे अधिकार राहतील-

१) नविन मराठी भाषा विभागामध्ये इतर संबंधित विभागातील कर्मचारीवृंद वर्ग करणे व आवश्यकतेनुसार नविन पदे निर्माण करणे.

२) नविन विभागासाठी जागा, साधन सामग्री व इतर सोयी सुविधा उपलब्ध करून देणे.

३) सचिवांसाठी मंत्रालयात जागा उपलब्ध करून देणे व वाहन खरेदी करण्यास मंजूरी देणे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००७१४१९२४४८००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने**

**सही/-**
**(गो.ग.आल्हाट)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा. मुख्य सचिव, यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,,मंत्रालय, मुंबई
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव. ,मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री, सा.प्र.वि. यांचे खाजगी सचिव,,मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त), यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (नियोजन),यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग व वि.चौ. अ.-१ यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
सचिव (र. व का.), सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहायक,,मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-** निवडनस्तीसाठी/संग्रहासाठी.